**बाह्य सहाय्यित कर्जाची मार्गदर्शक तत्वे निश्चित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-२०२४/प्र.क्र.८५/अर्थबळ**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ०८/०४/२०२५

**प्रस्तावना :-**

भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २९३(३) अन्वये राज्य शासनाला प्रदान केलेल्या अधिकारानुसार राज्याच्या एकत्रित निधीच्या तारणावर राज्य शासन कर्ज उभारते. सदर कर्जामध्ये राज्य शासनाचे कर्जरोखे, केंद्र शासनाकडील कर्जे, वित्तीय संस्थांकडील देशातंर्गत कर्जे तसेच केंद्र शासनामार्फत बाह्य सहाय्यित कर्जे यांचा प्रामुख्याने समावेश आहे. बाह्य सहाय्यित कर्जे ही प्रामुख्याने बहुपक्षीय एजन्सी, द्विपक्षीय एजन्सी, आंतरराष्ट्रीय वित्तीय संस्था जसे IBRD, IDA, IFAD, ADB, NDB, KfW, JICA इत्यादी वित्तीय संस्थाकडून केंद्र शासनामार्फत उभारण्यात येतात.

२. बाह्य सहाय्यित कर्जे उभारण्याबाबत सध्या राज्य शासनाकडून लिखित स्वरुपाच्या मार्गदर्शक सूचना नसल्याने बाह्य सहाय्यित कर्जाची कार्यपद्धती निश्चित करणे आवश्यक आहे. केंद्र शासनाच्या आर्थिक कार्य विभागाने (DEA) दि.२७/११/२०१९ च्या पत्रान्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन, बाह्य सहाय्यित कर्ज उभारण्यासाठीची कार्यपध्दती (मार्गदर्शक सूचना) निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

राज्य शासनासाठी बाह्य सहाय्यित कर्ज उभारण्यासाठीची कार्यपध्दती (मार्गदर्शक सूचना) खालीलप्रमाणे निर्गमित करण्यात येत आहे :-

२.१) ज्या प्रकल्पासाठी आंतरराष्ट्रीय वित्तीय संस्थेकडून कर्ज उभारण्यात येणार आहे, तो प्रकल्प राज्य शासन तसेच भारत सरकारच्या विकास प्राधान्याशी संलग्नित असावा. विभागाने बाह्य सहाय्यित कर्ज केवळ आर्थिक गरजा पूर्ण करण्याचे स्त्रोत म्हणून सादर करु नयेत.

२.२) प्रथमत: संबंधित प्रशासकीय विभाग Preliminary Project Report (PPR) योग्य रितीने तयार करण्याची कार्यवाही करेल. प्रशासकीय विभागाने प्रकल्पाचा PPR तयार करताना आवश्यकतेनुसार Maharashtra Institution for Transformation (MITRA) या संस्थेचे सहाय्य घ्यावे.

२.३) संबंधित प्रशासकीय विभागाने धारीकेव्दारे PPR मा.मुख्यमंत्री महोदयांना सादर करुन त्यांची मान्यता घ्यावी.

२.४) संबंधित प्रशासकीय विभागाने केंद्र शासनाच्या आर्थिक कार्य विभागाच्या (DEA) https://eapdea.gov.in या संकेतस्थळावर जाऊन त्यावर PPR अपलोड करावा.

२.५) संबंधित प्रशासकीय विभागाने मा.मुख्यमंत्री महोदयांची मान्यता घेतलेल्या टिप्पणीसह PPR ची प्रत नियोजन विभागामार्फत वित्त विभागाकडे धारिकेद्वारे पुढील आवश्यक त्या कार्यवाहीसाठी सादर करावी.

२.६) विभागाकडून प्राप्त PPR च्या अनुषंगाने अर्थबळ कार्यासन/वित्त विभाग यांचेकडून PPR ची छाननी करण्यात येऊन “Approved” असा शेरा केंद्र शासनाच्या आर्थिक कार्य विभागाच्या संकेतस्थळावर नोंदविण्यात येईल. तसेच सदर ऑनलाईन PPR केंद्र शासनाचे संबंधित मंत्रालय (Central Line Ministry), एकापेक्षा जास्त केंद्र शासनाचे मंत्रालय असल्यास सर्व संबंधित मंत्रालयांना तसेच नीति आयोगाला अग्रेषित करण्यात येईल.

२.७) त्यानंतर केंद्र शासनाचे संबंधित मंत्रालय (Central Line Ministry) तसेच नीति आयोग प्राप्त PPR ची तपासणी करुन, PPR च्या अनुषंगाने त्यांची शिफारस/शेरा पोर्टलवर अपलोड करेल.

२.८) केंद्र शासनाचे संबंधित मंत्रालय (Central Line Ministry) तसेच नीति आयोग यांचेकडून प्राप्त शिफारशी तसेच शेऱ्यासह प्रस्तावित Preliminary Project Report (PPR) छाननी समितीकडे (Screening Committee) सादर केला जाईल.

२.९) त्यानंतर केंद्र शासनाच्या आर्थिक कार्य विभागाकडून (DEA), छाननी समितीच्या (Screening Committee) बैठकीसंदर्भातील पत्र शासनाच्या वित्त विभाग तसेच संबंधित प्रशासकीय विभागास निर्गमित केले जाईल. शासनाच्या संबंधित प्रशासकीय विभागाने या बैठकीसंदर्भात MITRA या संस्थेस त्यांच्या स्तरावर कळवावे.

२.१०) आर्थिक कार्य विभागाच्या (DEA) छाननी समितीने (Screening Committee) प्रस्ताव मंजूर केल्यानतंर संबंधित प्रशासकीय विभागाने सविस्तर प्रकल्प अहवाल (Detailed Project Report) सक्षम अधिकाऱ्यांची मंजूरी घेऊन, संबंधित केंद्र शासनाचे मंत्रालयाकडे (Central Line Ministry) आणि वित्तीय संस्थेकडे (Funding Agency) लवकरात लवकर सादर करावा. सविस्तर प्रकल्प अहवालात (Detailed Project Report) खालील बाबी योग्यरित्या प्रतिबिंबित होणे आवश्यक आहे, असे आर्थिक कार्य विभाग यांनी निर्देशित केले आहे. सदर बाबी खालीलप्रमाणे आहेत :-

*The Detailed Project should adequately reflect the Strategic elements of techno-economic (economic viability, social cost benefit, value addition etc.) ecological (land use, ecological sustainability etc.), socio-cultural (target population and gender matters, participation, social impact, etc.), and institutional (institutional and organizational analysis, capacity building, training etc.) dimensions in the project design in measurable terms. An objective oriented project design in a matrix format along with work plan, cost and time schedule indicating target/output, cash flow statement etc. should also be a part of DPR.*

२.११) सविस्तर प्रकल्प अहवाल (Detailed Project Report) हा केंद्र शासनाच्या व्यय विभागाचे कार्यालयीन ज्ञापन क्र. OM No.1(2)-PF-II/03, dated 7th May 2003 मधील "सविस्तर प्रकल्प अहवाल सामान्य रचना" (Generic Structure of the DPR) नुसार असावा.

२.१२) बाह्य सहाय्यित प्रकल्पाकरीता कर्ज स्वरुपात निधी प्राप्त करुन घेण्यासाठी प्रशासकीय विभागांनी बहुपक्षीय एजन्सी/ द्विपक्षीय एजन्सी/आंतरराष्ट्रीय वित्तीय संस्था यांचेकडे परस्पर प्रस्ताव सादर करु नयेत. बाह्य सहाय्यित प्रकल्प कर्जाच्या अटी व शर्ती निश्चित करण्यासाठी राज्य शासनाचा वित्त विभाग तसेच केंद्र शासनाचा आर्थिक कार्य विभाग (DEA) यांचेमार्फतच बहुपक्षीय एजन्सी/द्विपक्षीय एजन्सी/आंतरराष्ट्रीय वित्तीय संस्था यांच्याशी वाटाघाटी (Negotiations) करणे बंधनकारक असेल.

२.१३) बाह्य सहाय्यित प्रकल्प कर्जाच्या अटी व शर्ती निश्चित करण्यासाठी झालेल्या वाटाघाटी (Negotiation) बैठकीच्या इतिवृत्तावर, संबंधित प्रशासकीय विभाग, वित्त विभाग, आर्थिक कार्य विभाग (DEA), आंतरराष्ट्रीय/वित्तीय संस्था यांचे प्राधिकृत स्वाक्षरीकार स्वाक्षरी करतील. बाह्य सहाय्यित प्रकल्प कर्ज करारावर (Loan Agreement) बहुपक्षीय एजन्सी/ द्विपक्षीय एजन्सी/आंतरराष्ट्रीय वित्तीय संस्था आणि आर्थिक कार्य विभाग (DEA) यांचे प्राधिकृत

स्वाक्षरीकार स्वाक्षरी करतील. प्रकल्प करारावर (Project/Programme Agreement) वित्त विभाग, संबंधित प्रशासकीय विभाग, अंमलबजावणी यंत्रणा तसेच बहुपक्षीय एजन्सी/द्विपक्षीय एजन्सी/आंतरराष्ट्रीय वित्तीय संस्था यांचा प्राधिकृत स्वाक्षरीकार यांच्या स्वाक्षऱ्या करण्यात येतील.

२.१४) संबंधित प्रशासकीय विभागाने बाह्य सहाय्यित प्रकल्प कर्जाचे अनुषंगाने कर्ज करारनामा (Loan Agreement) / प्रकल्प करारनामा {Project (Programme) Agreement} निश्चित करण्यासाठी होणाऱ्या वाटाघाटीच्या (Negotiation) पूर्वी सदर कर्जाला आणि प्रकल्पाला मा.मंत्रिमंडळाची मान्यता घ्यावी.

२.१५) संबंधित प्रशासकीय विभागाने मा.मंत्रिमंडळ बैठकीच्या मान्यतेनंतर बाह्य सहाय्यित प्रकल्पाचा सविस्तर शासन निर्णय निर्गमित करावा.

२.१६) प्रकल्प अंमलबजावणी संस्था यांनी प्रकल्प पूर्ण झाल्यानंतर त्याचा भौतिक व आर्थिकदृष्ट्या पूर्णत्वाचा अहवाल व प्रकल्प उद्दिष्ट साध्य केल्याबाबतचा मूल्यमापन अहवाल प्रशासकीय विभागामार्फत केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाला सादर करावा.

२.१७) राज्य शासनांना उपलब्ध करुन देण्यात येणा-या बाह्य सहाय्यित कर्जासाठी कमिटमेंट चार्जेस, परकीय चलनाची जोखीम इत्यादी बाबींची जबाबदारी राज्य शासनाची असल्यामुळे, प्रकल्प हा मूळ वेळापत्रकानुसार पूर्ण करण्याची दक्षता संबंधित प्रशासकीय विभागाने घ्यावी.

२.१८) बाह्य सहाय्यित कर्ज हे केंद्र शासनाकडून मंजूर होत असलेल्या Net Borrowing Ceiling चा भाग आहे. त्यामुळे, बाह्य सहाय्यित कर्जे उभारीत असताना ही कर्जे FRBM कायद्याप्रमाणे वित्तीय तूटीच्या मर्यादेत असण्याची तसेच केंद्र सरकारने मंजूर केलेल्या Net Borrowing Ceiling च्या मर्यादेत असण्याची दक्षता घ्यावी.

३. शासनाने घेतलेल्या बाह्य सहाय्यित प्रकल्प कर्जाचे लेखांकन तसेच अर्थसंकल्पीय तरतूदीबाबत मार्गदर्शक सूचना पुढीलप्रमाणे निर्गमित करण्यात येत आहे :-

३.१) संबंधित प्रशासकीय विभागाने जेथे आवश्यक आहे तेथे समकक्ष निधी (Counterpart Funding) व अर्थसंकल्पीय तरतूद करावी. सदर निधीचे योग्यरित्या लेखांकन होण्याकरीता, कर्ज स्वरुपात प्राप्त होणाऱ्या निधीच्या अर्थसंकल्पीय तरतूदीकरीता स्वतंत्र लेखाशिर्ष तसेच राज्य शासनाचा स्वत:चा हिस्सा (Counterpart Funding) याकरीता स्वतंत्र लेखाशिर्ष असे दोन खर्चाची लेखाशिर्षे

संबंधित प्रशासकीय विभागाने प्राप्त करुन घ्यावीत. याबाबतच्या सूचना आर्थिक कार्य विभागाचे (DEA) अर्धशासकीय पत्र क्र.5/1/1999-FB-II, dated 12/05/1999 तसेच OM No. 12/24/94 EFC (Coord.), dated 20/09/1994 अन्वये देण्यात आल्या आहेत.

३.२) बाह्य सहाय्यित प्रकल्पांतर्गत प्राप्त होणाऱ्या कर्जाचा विनियोग हा राज्य शासनाच्या प्रशासकीय विभागामार्फतच थेट होणार असल्यास सदर कर्जाची परतफेड व त्यावरील व्याज, कमिटमेंट चार्जेस व इतर खर्च याबाबत अर्थसंकल्पीय तरतूद ही ऋण व हमी कार्यासनामार्फत करण्यात येईल.

३.३) बाह्य सहाय्यित प्रकल्पांतर्गत प्राप्त होणा-या कर्जाचा संबंधित प्रशासकीय विभागाच्या अधिनस्त महामंडळ/उपक्रम/कंपनी/संस्था यांच्यामार्फत विनियोग होणार असल्यास तसेच सदर कर्जाची रक्कम शासनाकडून संबंधित महामंडळ/उपक्रम/कंपनी/संस्था यांना कर्ज म्हणून वितरीत केली जाणार असल्यास, याबाबत संबंधित प्रशासकीय विभागाने कर्ज वितरणासाठी एक लेखाशिर्ष, सदर कर्जाच्या वसूलीकरीता जमेचे एक लेखाशिर्ष तसेच व्याजाच्या जमेकरीता एक लेखाशिर्ष उपलब्ध करुन घ्यावे.

३.४) बाह्य सहाय्यित प्रकल्पांतर्गत प्राप्त होणारे कर्ज संबंधित महामंडळ/उपक्रम/कंपनी/संस्था यांना वितरीत करण्यापूर्वी संबंधित महामंडळ/उपक्रम/कंपनी/संस्था व शासन यांच्यामध्ये विधि व न्याय विभागाने Vetting केलेल्या नमुन्यामध्ये दुय्यम कर्ज करार (Subsidiary Loan Agreement)**(परिशिष्ट-अ)** करण्यात यावा व सदर कराराचे पालन करण्याची संबंधित प्रशासकीय विभागाने वेळोवेळी आढावा घेऊन दक्षता घ्यावी.

३.५) केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयांतर्गतच्या व्यय विभागाकडून ऑनलाईन प्राप्त होणारे, बाह्य सहाय्यित कर्जाच्या वितरणाचे advice तसेच कर्जाच्या मुद्दलाची व त्यावरील व्याजाच्या वसूलीचे advice संकलित करुन त्यांचा भारतीय रिझर्व्ह बँकेच्या दैनिक स्क्रोलसोबत तसेच महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र -१, मुंबई यांच्या मासिक लेख्याशी ऋण व हमी कार्यासनाने ताळमेळ घेऊन तसा मासिक अहवाल सचिव (वित्तीय सुधारणा ) यांना सादर करावा.

३.६) केंद्र शासनाचा मदत, लेखा व लेखापरीक्षण विभाग (Aid, Accounts and Audit Division), वित्त मंत्रालय यांच्याकडून वित्तीय वर्षाअखेरचा बाह्य सहाय्यित प्रकल्प कर्जाचा वार्षिक अहवाल प्राप्त करुन त्याचा महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई व ऋण व हमी कार्यासनाने ठेवलेल्या लेख्यांशी ताळमेळ ऋण व हमी कार्यासनाने घ्यावा.

४. आर्थिक कार्य विभाग, वित्त मंत्रालय यांनी राज्य शासनाच्या वित्तीयदृष्ट्या सक्षम (Financially Strong) संस्थाना बहुद्देशीय वित्तीय संस्थाकडून राज्य शासनाची हमी तसेच केंद्र शासनाच्या काऊंटर हमीवर, थेट कर्ज (ODA- Official Development Assistance) उभारण्याची मुभा दिली आहे. सदर कर्ज सुविधा उपलब्ध करुन घेण्यासाठी आर्थिक कार्य विभाग, वित्त मंत्रालयाने वेळोवळी विहित केलेल्या अटींचे पालन करणे संबंधित संस्थांना बंधनकारक राहील.

५. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. EAP-2013/C R 10/Desk 1414, दि.२ मार्च, २०१३ अन्वये चालू बाह्य सहाय्यित प्रकल्प कर्जाच्या संनियंत्रणासाठी उच्चाधिकार समिती नियुक्त करण्यात आली आहे. बाह्य सहाय्यित प्रकल्पाची कालबध्द अंमलबजावणी होणेसाठी सदर प्रकल्पाच्या वित्तीय तसेच भौतिक प्रगतीचा नियमित आढावा घेणे ही सदर समितीची कार्यकक्षा आहे.

६. या सूचना indicative स्वरुपाच्या असून, केंद्र शासनाच्या आर्थिक कार्य विभागाकडून (DEA) बाह्य सहाय्यित कर्जाबाबत वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या सूचना/मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करणे आवश्यक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा सांकेतांक २०२५०४०८१२५७१८९६०५असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by SUNIL SHANKAR SHINDE
Date: 2025.04.08 12:58:14 +05'30'

**( सुनिल शिंदे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव,
२) मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
३) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५) मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
७) सर्व सन्माननीय सदस्य, विधानपरिषद/ विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सदस्य,विधानमंडळ, मुंबई,
८) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,

९) मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

१०) मा.उप मुख्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

११) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

१२) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,

१३) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,

१४) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग (सर्व), मंत्रालय, मुंबई,

१५) संचालक, लेखा व कोषागारे, (म.रा.) मुंबई,

१६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

# परिशिष्ट-अ

## Project Name
## SUBSIDIARY LOAN AGREEMENT

This AGREEMENT is made at----------------------day of ---------------between the Government of Maharashtra exercising executive power of the Government of the State of Maharashtra represented by the Additional Chief Secretary/Principal Secretary/Secretary, ----------------------------- Department having office at ------ Floor, Mantralaya, Mumbai and Additional Chief Secretary, Finance Department having office at 5th floor, Mantralaya, Mumbai (hereinafter called 'the Government of Maharashtra') (which expression shall unless repugnant to the context or meaning thereof be deemed to include executors, administers and official assigns)" Party of the First Part

And

----------------------------------------------------------------------------, a Statutory body constituted and established under the provisions of the ---------------------------------------------------------------------------------------------------------------------------------- having its registered office at ---------------------------------------------------------------------------- (hereinafter referred to as the ("--------------------------") represented by ---------------------------------------------------- (Which expression shall, unless it be repugnant to the context or meaning thereof be deemed to include executors, administers and official assigns) Party of the Second Part.

WHEREAS-

1. By the Loan Agreement executed on ----------------------------------------, at New Delhi between the -------------------------------------------------------- (hereinafter called "-------------------------------") and the Government of India, (hereinafter called the "Central Government"), ----(name of financial institution)--- has agreed to provide and make available to the Central Government upon such terms and Conditions more particularly recited in the said Agreement, a sum or sums in diverse currencies by way of loan is (to be provided) and offered to such bodies as stated therein is to be applied to the respective parts of --------------------------------------------------------- project (hereinafter referred to as the "said project") as described therein. The loan is to be provided for major System Components like ---------------------------------------------------------------------------------------------------------------------------------------------------------------------------------------------------------------------------

2. -------------------- being statutory body, is charged with the duty of executing the plans and programs (directed to) for the ------------------------------------------------------------ -------------------------------------------------------------------------------------------------------- --------------------------------------------------------------------------------------------------------

3. The (name of financial institution)-- on ---------- day of (Month) (Year), at New Delhi had executed a Project Agreement with the Govt. of Maharashtra setting out particulars of the said project, the share of loan payable to each statutory body, the part of the project to be executed by such body and duties devolving upon such body and the other ancillary details.

4. The Government of Maharashtra has appointed and accepted ----------------- as a nodal agency to co-ordinate with all the implementing agencies for the said project and to liaise with the (name of financial institution)-- for effective management and monitoring of the said project.

5. In accordance with the loan Agreement referred to in Para 1 above, Government of Maharashtra, now agrees to enter into a Subsidiary Loan Agreement to define the terms and conditions to regulate the transfer of the proceeds of the loan to the -------------- under the said Project Agreement, and accordingly, the Government of Maharashtra and ---------- have set out hereafter the terms and conditions of the Subsidiary Loan Agreement.

**NOW, THEREFORE, THE PARTIES HERETO HEREBY AGREE AS FOLLOWS:**

**DECLARATION AT THRESHOLD**

It is hereby agreed and declared by and between the parties thereto that the loan agreement executed between ---------- and the Central Government as recited hereto at clause 1 and the Project Agreement executed between the --------------------------- and the Govt. of Maharashtra as recited in clause 4 hereto deemed to be constituted and incorporated in this Agreement and notwithstanding anything contained herein, the said two Agreements shall have overriding effect in the event of any repugnancy arising between this Agreement and said two Agreements.

## ARTICLE-1

## FUNDS FOR PROJECTS AND TERMS OF LOAN

1.1 To enable ------------------ to duly carry out and execute the said Project described in the said Loan Agreement as also in the Project Agreement executed between ---------------- and the Government of Maharashtra (hereinafter referred to as the specific project), the Govt. of Maharashtra agrees to lend to ------------- and ------------------- agrees to borrow the proceeds of the loan made available by the Government of India according to the Loan Agreement. Both the Govt. of Maharashtra and --------------- agree that such proceeds of the loan shall be advanced and routed through Govt. of Maharashtra to ------------

1.2 --------------- shall apply and utilize the amount of the said loan only for execution of the works and procurement of goods and services required for the specific project as provided in the Project Agreement.

1.3. -----------shall repay the amount of the said loan with interest to the Govt. of Maharashtra in the following manner:-

The Principal amount alongwith interest as per ------------- Repayment Schedule and Commitment charges including any other charges, as charged by -------------. Any breach in repayment shall be considered as breach of this agreement and the Government of Maharashtra may set Art.6.1 of this Agreement in motion.

1.4 ------------- shall open and maintain an ESCROW account for all funds received for this specific project.

1.5 ------------ would deposit the loan amount in the State consolidated fund account through Central Government. The said loan amount would be provided to the ------------ as loan. On repayment of loan along with interest by --------------, the principal amount along with interest thereon shall be reimbursed by the State Government to ---------------through Central Government. The -------------- shall repay such loan and interest amount to the State Government upto the last date of the same month.

1.6 The loan amount of -------------- Million as and when credited through ------------, the same shall be transferred as it is to the -------------. Even if the ------------- is increased/ decreased, the amount would be stable and credited to ----------------according to the sanctioned loan.

## ARTICLE-2

## SECURITY FOR REPAYMENT OF THE LOAN AND PAYMENT OF INTEREST

2.1 ---------------- shall open a separate Escrow Account for these metro projects. Expenditure from this Escrow Account shall be permissible only for the project for which it is opened. In this escrow account, all revenues from the project shall be deposited.

2.2 ----------------- shall pledge over ------------------- assets.

## ARTICLE-3

## CONTRIBUTION OF COUNTER - PART FUNDS BY ---------------

3.1 The (name of PSU/Company/Corporation) from its own funds shall contribute a sum in the projects as prescribed in the following Government Resolutions of the (Concerned Department's Name) GOM,

a) For

b) For

c) For,

Thereabout to be called the Counterpart funds towards the cost of the said specific project.

## ARTICLE-4

**EXECUTION OF THE PROJECT-**

4.1 ------------------------ hereby declares its total and absolute commitment to the objective of the said specific project and shall duly execute and carry out the specific projects with due diligence, efficiently and in strict conformity with appropriate Administrative, financial and engineering practices, substantially in accordance with the implementation procedure and schedule.

4.2 During the execution of the said Specific Project, the ---------------- shall strictly observe the terms and conditions to be observed and performed inter-alia by the Central Government under the said Loan Agreement, and the Govt. of Maharashtra under the said special Project Agreement, in so far as the same are applicable, as if ------------------- is originally a party to and has executed both the said Agreements instead of the Central Government and the Govt. of Maharashtra, respectively. Without prejudice to the generality of these provisions, --------------shall be responsible for each obligation ------------, to the satisfaction of Govt. of Maharashtra.

4.3 Except as the ----------------- may otherwise agree in writing, ---------------- shall enter into contracts for the purchase or procurement of goods and services and for execution of the Civil works required for such Specific Project and to be financed out of the proceeds, strictly in accordance with the provision of the said Project Agreement.

4.4 ------------- shall exclusively use all goods and services financed out of the loan made available to it by the Govt. of Maharashtra hereunder for the purpose of the said project.

4.5 (a) ------- shall furnish to the -----------, promptly under the instruction of the State Government the plans, specifications, reports, contracts documents and work and procurement schedules of the Specific Project, and any material modifications thereof or additions thereto in such details as the ----------------- shall reasonably request, so far the same has been prepared by the ---------------------

(b) ---------------shall (i) maintain the forms prescribed by ----------------, the records and follow and adhere the procedures prescribed by the ------------------- and monitor the progress of specific Project (including the cost and benefits to be derived from it), (ii) furnish directly to the --------------- at regular intervals all such information as ----------------- shall reasonably request concerning the Specific Projects.

(c) -------------- shall permit the -----------------'s representatives as and when required by them to examine, inspect and supervise all sites, work, equipment and any relevant records and documents related to ----------'s obligations under this Agreement and render them all assistance for the said purposes and incorporate the necessary changes and suggestions that are in consonance with the prevailing laws, as proposed by the -----------'s and --------------'s representatives.

4.6 --------------------- may take any such steps which are necessary to acquire, as and when needed all required land including rights in respect of land for the construction and operation of the facilities under the specific projects, and shall upon request, furnish to ---------, relevant information and evidence to the satisfaction of ------------------

4.7 Promptly after completion of the project, but in any event not later than four months after the closing date or such later date as may be agreed for this purpose between the parties hereto, --------------- shall prepare and furnish a report, of its scope with all details as required by -----------------.

## ARTICLE-5

**PARTICULAR COVENANTS -**

----------------------- shall (i) maintain separate records and accounts in accordance with sound and recognized accounting principles, practice and procedures consistently followed so that the same truly reflects its resources, expenditures and operations related to the Specific Project, and (ii) furnish statements related to the specific project for each fiscal year, as soon as available, but in any case not later than six months after the end of each financial year.

## ARTICLE-6

**RIGHTS AND REMEDIES OF THE GOVT. OF MAHARASHTRA**

6.1 If the -------------------- shall breach any of its obligation or condition prescribed under this Agreement, at any stage the Govt. of Maharashtra shall terminate this Agreement by giving two months' notice in writing to --------------- in that behalf and on the expiry of the period of such notice, this Agreement shall stand terminated without any further act or deed and in that event, the entire principal amount advanced to --------------------- by the Govt. of Maharashtra hereunder together with accrued interest, cost, charges and expenses shall become immediately repayable by --------------------------- to the Govt. of Maharashtra and shall be deemed to be arrears of land revenue and upon being required to do so by notice in writing by the Govt. of Maharashtra, ----------------- shall repay the entire amount specified by the Govt. of Maharashtra. The Govt. of Maharashtra shall without prejudice to its rights and remedies be entitled to enforce recovery of the amount so specified in the notice as arrears of the land revenue.

6.2 Without prejudice to the generality of Article 1.3, if ---------- shall commit any default in due repayment of any equated installment of the loan or payment of interest, payable to the Govt. of Maharashtra within stipulated time under this Agreement, then the Govt. of Maharashtra shall be entitled to suspend the operation of this Agreement or part thereof. The ----------------- shall rectify entire default, to the satisfaction of the Govt. of Maharashtra within the period of 30 days from default, which the Govt. of Maharashtra may extend in its discretion for further period of 15 days. The failure of the ---------------------- to rectify the default within the prescribed/extended period shall result in invocation of Article 6.1 of the Agreement.

6.3 --------------- shall indemnify and keep indemnified the Govt. of Maharashtra from and against all the consequences and liabilities whatsoever to ------------- or to the Central Government to which the Govt. of Maharashtra may become liable on account of any act or omission on the part of ------------- in the course of executing the Specific Projects.

6.4 No loan or installment of the loan shall be payable by the Govt. of Maharashtra to ----------------, if the Govt. of Maharashtra for any reason whatsoever, not been able to receive from the Central Government, the proceeds of the loan under the Loan Agreement.

## ARTICLE-7

**EFFECTIVE DATE: TERMINATION: CANCELLATION AND SUSPENSION-**

7.1 This Agreement shall come into force on the date when the Loan Agreement shall become effective.

7.2 This Agreement and all obligation of the Govt. of Maharashtra, thereunder shall be coterminous with the Loan Agreement.

7.3 Notwithstanding any cancellation or suspension of the Loan Agreement or the Project Agreement, all the provisions of this Agreement shall continue in full force and effect to the extent of the amount released by Govt. of Maharashtra to (Name of PSU/Company/ Corporation)

## ARTICLE-8

**ADDRESS**

8.1 Any action required or permitted to be taken and any document required or permitted to be executed under this Agreement for and on behalf of the Govt. of Maharashtra shall be taken or executed by the Principal Secretary to Government of Maharashtra, ---------------- Development or such other person as he shall designate in writing.

8.2 Additional Metropolitan Commissioner, -------------------------for the time being is designated as the representative of the ------------------- for the purpose of this Agreement. Any action required or permitted to be taken or any document required or permitted to be taken or any document required or permitted to be executed under this Agreement for and on behalf of -------------------------- shall be taken or executed by the --------------------------------------------- or such other person or persons as the Additional Metropolitan Commissioner shall designate in writing.

8.3 The following addresses are specified for the purpose of this Agreement.

**FOR GOVERNMENT OF MAHARASHTRA**
Additional Chief Secretary to Government of Maharashtra,
Finance Department, Mantralaya,
Mumbai-400032.

&
ACS/PS/Secretary to Government of Maharashtra,
------------- --------Department (-------------), Mantralaya,
Mumbai-400032.

**FOR -------------------**

----------------------------, Mumbai -------
 ------------------------------------------------
------------------------------------------------

## ARTICLE-9

**MISCELLANEOUS**

9.1 Every notice or intimation required or permitted to be given under this Agreement or under the Loan Agreement and Project Agreement shall be in writing. Such notice or intimation shall be deemed to have been duly served when it shall have been delivered by hand or by mail, telegram, cable, telex or radiogram to the party to which it is required or permitted to be given at on the address hereinbefore specified or at such other address as such party shall have communicated by notice to the party by giving such notice or intimation.

In the witness whereof the parties hereunto have set and subscribed their respective hands and seal on the day and year first hereinabove written.

Signed, Sealed and Delivered for and on behalf of
The Governor of Maharashtra by Additional Chief Secretary to
Government of Maharashtra, in Finance Department

In the presence of

1.

2.

Signed Sealed and Delivered for and on behalf of
The Governor, the State of Maharashtra by Principal Secretary to
Government of Maharashtra, in ------------------------ Department
In the presence of

1.

2.

Signed Sealed and Delivered for and on behalf of

---

---

1.

2.